**मौजे आरे, गोरेगाव व मरोळ - मरोशी येथील संजय गांधी राष्ट्रीय उद्यानांतर्गत येणाऱ्या क्षेत्राच्या सभोवती संरक्षण भिंत बांधण्याबाबतच्या ११ अंदाजपत्रकांस प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- एस-१०/२०२३/प्र.क्र.७४/फ-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक: ३१ मार्च, २०२३.

**वाचा :-**

१. महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र. एमएससी-२०११/प्र.क्र.१७८/फ-५, दिनांक ३०.०९.२०११.
२. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम भाग-२, दि. २०.०९.२०१९. च्या शासन निर्णयातील भाग एक उप विभाग-५ परि. क्र.१३४(१),१३४(२),१३४ (३) मधील तरतुदी
२. सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०/इमा-२, दि.२५.०९.२०१९.
३. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांचे जा.क्र.मु.अ.(मुं.)का-१/७०९ ते ७१९/२०२३, दिनांक ९.०२.२०२३.
४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास) यांचे पत्र क्र. कक्ष-२४/लेखा/प्र.क्र.५६ (२०२२-२३)/११५२/२०२२-२३, दिनांक ६.०३.२०२३.

**प्रस्तावना :-**

मुंबई शहरातील वाढत्या प्रदुषणास आळा घालण्यासाठी तसेच मुंबई उपनगरात उपलब्ध झाडोरा / वनांचे अधिक प्रभाविपणे संरक्षण व संवर्धन करण्यासाठी आरे येथील दुग्धव्यवसाय व वन विभागाच्या ताब्यातील मौजे आरे, गोरेगाव व मरोळ-मरोशी, ता.बोरीवली, जि. मुंबई उपनगर येथील एकूण ३२७.१९७ हे.आर क्षेत्र भारतीय वन अधिनियम, १९२७ च्या कलम ४ अन्वये राखीव वने म्हणून घोषीत करण्याचा मनोदय दिनांक १२.१०.२०२० रोजीच्या अधिसूचनेन्वये जाहीर करण्यात आला आहे. प्रस्तुत क्षेत्राचे पर्यावरणीय महत्व, संवेदनशीलता व अतिक्रमणाची शक्यता लक्षात घेता, सदर क्षेत्राच्या संरक्षणाच्या दृष्टीने उपाययोजना म्हणून क्षेत्राभोवती संरक्षण भिंत बांधणे अत्यंत आवश्यक आहे.

यास्तव, मौजे आरे, गोरेगाव व मरोळ - मरोशी येथील अधिसूचित ३२७.२०१ हे.आर क्षेत्राच्या सभोवती संरक्षण भिंतीच्या रु. ८८९.०८ लक्ष च्या एकूण ११ अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबतचा प्रस्ताव प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र. ४ च्या पत्रान्वये शासनास सादर केला आहे.

**२.** वित्त विभागाच्या वित्तीय अधिकारामध्ये सुधारणा करण्यासंदर्भात निर्गमित करण्यात आलेल्या संदर्भ क्र. १ च्या दिनांक २०.०९.२०१९ मधील भाग एक उप विभाग-५ परि. क्र.१३४(१), १३४(२), १३४ (३) मधील तरतुदी नुसार तसेच सार्वजनिक बांधकाम विभागाच्या संदर्भ क्र. २ दिनांक २५.०९.२०१९ च्या परिपत्रकान्वये स्थापत्य व विद्युत कामाशी संबंधित रु. १५.०० कोटी रक्कमेपर्यंतच्या कामांना मुख्य अभियंता, सार्वजनिक

बांधकाम प्रादेशिक विभाग यांनी तांत्रिक सहमती दिल्यानंतर प्रशासकीय मान्यता देण्याबाबतचे अधिकार संबंधित उपभोक्ता विभागास देण्यात आलेले आहेत.

३. प्रस्तुत कामांच्या अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय दिनांक २५.०९.२०१९ च्या तरतूदीनुसार मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांनी संदर्भ क्र. ३ च्या पत्रान्वये तांत्रिक मंजूरी (Technical Approval) दिलेली आहे. त्यानुसार सदर अंदाजपत्रकांस प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय:-**

मौजे आरे, गोरेगाव व मरोळ- मरोशी येथील संजय गांधी राष्ट्रीय उद्यानाच्या ताब्यातील क्षेत्राच्या सभोवती संरक्षण भिंत बांधण्याबाबतच्या रक्कम रुपये ८,८९,०८,६१७/- (अक्षरी रु. आठ कोटी एकोणनव्वद लक्ष आठ हजार सहाशे सतरा फक्त) च्या अंदाजपत्रकांस खालील विवरणपत्रात नमूद केल्यानुसार तसेच नमूद अटी व शर्तीस अधीन राहून प्रशासकीय मान्यता (वित्तीय मान्यता वगळून) प्रदान करण्यात येत आहे :-

| अ. क्र. | कामाचा तपशिल | प्रशासकीय मान्यता प्रदान रक्कम (रु. लक्ष) |
|---|---|---|
| १ | संजय गांधी राष्ट्रीय उद्यान अंतर्गत आरे वनहद्दतील नगर भूमापन क्र. १ (युनिट क्र. ३२ आणि १) वरील (Ch. २८१ ते Ch. ७८८ मीटर) संरक्षक भिंत बांधणे. | रु. ९४,३३,३५४/- |
| २ | संजय गांधी राष्ट्रीय उद्यान अंतर्गत आरे वनहद्दतील नगर भूमापन क्र. १ (युनिट क्र. ३२ आणि १) वरील (Ch. ७८८ ते Ch. १२८८ मीटर) संरक्षक भिंत बांधणे. | रु. ९९,५५,२४३/- |
| ३ | संजय गांधी राष्ट्रीय उद्यान अंतर्गत आरे वनहद्दतील नगर भूमापन क्र. ४ (युनिट क्र. ३१ आणि ३२) वरील (Ch. ० ते Ch. ४४० मीटर) संरक्षक भिंत बांधणे. | रु. ८४,८०,४४०/- |
| ४ | संजय गांधी राष्ट्रीय उद्यान अंतर्गत आरे वनहद्दतील नगर भूमापन क्र. ४ (युनिट क्र. ३१ आणि ३२) वरील (Ch. ४४० ते Ch. ९७३ मीटर) संरक्षक भिंत बांधणे. | रु. ९८,३८,९५७/- |
| ५ | संजय गांधी राष्ट्रीय उद्यान अंतर्गत आरे वनहद्दतील नगर भूमापन क्र. ४ (युनिट क्र. ३१ आणि ३२) वरील (Ch. ९७३ ते Ch. १३७५ मीटर) संरक्षक भिंत बांधणे. | रु. ७५,९८,२८२/- |
| ६ | संजय गांधी राष्ट्रीय उद्यान अंतर्गत आरे वनहद्दतील नगर भूमापन क्र. ४ (युनिट क्र. ३१ आणि ३२) वरील (Ch. १३७५ ते Ch. १८९४ मीटर) संरक्षक भिंत बांधणे. | रु. ९९,७४,७६४/- |
| ७ | संजय गांधी राष्ट्रीय उद्यान अंतर्गत आरे वनहद्दतील नगर भूमापन क्र.२१ (युनिट क्र. ४) वरील (Ch. ० ते Ch. ४१० मीटर) संरक्षक भिंत बांधणे. | रु. ७६,७८,१८३/- |
| ८ | संजय गांधी राष्ट्रीय उद्यान अंतर्गत आरे वनहद्दतील नगर भूमापन क्र.२१ (युनिट क्र. ४) वरील (Ch. ४१० ते Ch. ७१० मीटर) संरक्षक भिंत बांधणे. | रु. ५४,९३,२१९/- |
| ९ | संजय गांधी राष्ट्रीय उद्यान अंतर्गत आरे वनहद्दतील नगर भूमापन क्र.२१ (युनिट क्र. ४) वरील (Ch. ७१० ते Ch. १०१६ मीटर) संरक्षक भिंत बांधणे. | रु. ६१,८५,४८१/- |
| १० | संजय गांधी राष्ट्रीय उद्यान अंतर्गत आरे वनहद्दतील नगर भूमापन क्र.२१ (युनिट क्र. १३) वरील (Ch. ० ते Ch. ४२० मीटर) संरक्षक भिंत बांधणे. | रु. ८०,५३,६९४/- |
| ११ | संजय गांधी राष्ट्रीय उद्यान अंतर्गत आरे वनहद्दतील नगर भूमापन क्र.२१ (युनिट क्र. १३) वरील (Ch. ४२० ते Ch. ७६० मीटर) संरक्षक भिंत बांधणे. | रु. ६२,१७,०००/- |
| | **एकूण** | **रु. ८,८९,०८,६१७/-** |

२. **अटी व शर्ती -**

१. प्रस्तावानुषंगाने कार्यवाही करताना सार्वजनिक बांधकाम विभाग शासन निर्णय क्र.बी.डी.जी-२०१४ /प्र.क्र.९६/इमा-३, दिनांक ८.०७.२०१४ मध्ये नमूद कार्यपध्दतीचा अवलंब करण्यात यावा.

३. काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी. तसेच सदर क्षेत्र निर्विवाद वन विभागाच्या ताब्यात असल्याची खात्री करावी.

३. सविस्तर अंदाजपत्रके तयार करताना व काम सुरु करण्यापूर्वी संरक्षण भिंतीचे संकल्पन तयार करण्यात यावे व त्यास प्राधिकाऱ्याची मान्यता घेऊन व तांत्रिक मान्यता प्रदान केल्यानंतरच शासन तरतुदींनुसार निविदा कार्यवाही करण्यात यावी.

४. प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क्र.-१, दि.१०.०१.२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

५. सदर काम रु. ८,८९,०८,६१७/ इतक्या रक्कमेस पुर्ण होईल याची दक्षता घ्यावी.

६. सदर कामाच्या बांधकामाचा खर्च "राखीव वनांचे सर्व्हेक्षण, जमाबंदी व सिमांकन ४४०६ ००५३" या लेखाशिर्षांतर्गत मंजूर नियतव्ययातून करण्यात यावा.

७. सदरहू कामे करताना वन (संवर्धन) अधिनियम, १९८० अंतर्गत तरतूद तसेच प्रचलित कायदे / नियम संदर्भाधिन तरतूदींचा भंग होणार नाही. तसेच कोणतीही अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी.

८. शासन निर्णय क्रमांक एमएससी-२०११/प्र.क्र.१७८/फ-५, दिनांक ३०.०९.२०११ च्या परिशिष्टात नमूद केलेल्या अटी व शर्ती बंधनकारक असतील.

३. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम भाग-२, दिनांक २०.०९.२०१९ अन्वये वित्तीय अधिकारामध्ये सुधारणा करण्यासंदर्भातील शासन निर्णयातील भाग एक उप विभाग-५ परि. क्र.१३४(१),१३४(२),१३४ (३) नुसार तसेच सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन परिपत्रक दिनांक २५.०९.२०१९ अन्वये स्थापत्य व विद्युत रु.१५.०० कोटी किंमती पर्यंतच्या कामांना संबंधित मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांनी तांत्रिक सहमती दिल्यानंतर प्रशासकीय मान्यता देण्याबाबतचे अधिकार संबंधित उपभोक्ता विभागास प्रदान करण्यात आले आहे. सदर वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३३११४४२१७९३१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

APARNA SUHAS UPASANI

Digitally signed by APARNA SUHAS UPASANI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=130a2ee40839d75ff18e93244499097828091ef8e09f856d6e8f0c403254f40a, pseudonym=3697F9C1859177438542B4E103592744309AD950, serialNumber=00DDF81FCF3DFD3E814E1C6D5D5D1249D28D65601EB04ECDFF837C158CB2ED4C, cn=APARNA SUHAS UPASANI
Date: 2023.03.31 14:47:52 +05'30'

**(अपर्णा उपासनी)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर.

४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संधारण) महाराष्ट्र राज्य, नागपूर.

५) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पश्चिम मुंबई.

६) मुख्य वनसंरक्षक (भूमी अभिलेख कक्ष), नागपूर.

७) वनसंरक्षक तथा संचालक, संजय गांधी राष्ट्रीय उद्यान, बोरीवली.

८) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई /नागपूर.

९) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

१०) वित्त विभाग, व्यय १०/ अर्थसं-६ मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

११) कार्यासन अधिकारी (फ-२) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

१२) कार्यासन अधिकारी, ब-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

१३) निवडनस्ती, कार्यासन (फ-३), म.व.व.वि., मंत्रालय, मुंबई-३२.